**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा मोहपुर, ता.किनवट, जि. नांदेड येथील इमारत दुरुस्तीच्या अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२०१०/प्र.क्र.३००/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १७ फेब्रुवारी, २०११.

**वाचा:-** आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे जा.क्र.इमा-१०/प्र.क्र.०२/का./८(३), दि.१७ मे, २०१० चे पत्र.

**प्रस्तावना** : आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी संदर्भाधीन दि. ४/५/२०१० च्या पत्रान्वये प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, मोहपुर, ता.किनवट, जि. नांदेड येथील इमारत दुरुस्तीचे एकुण रु.१४,९८,०००/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केले आहे.

सदर अंदाजपत्रक संबंधित कनिष्ठ अभियंता यांनी तयार केले असून उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.२, किनवट यांनी तपासले आहे. प्रकल्प अधिकारी एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट, उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.२, किनवट व कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग, भोकर यांनी साक्षांकित केले आहे. अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित असून वरील अंदाजपत्रकात कॉन्टीजन्सी चार्जचा समावेश करण्यात आला असून अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, मोहपुर ता. किनवट,जि.नांदेड येथील इमारत दुरुस्तीच्या अंदाजपत्रकांतील ४% कॉन्टीजन्सी चार्जची तरतूद योग्य करुन रु. १५,४६,८०८/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करुन त्याची सी.डी.शासनास सादर करण्यात यावी.

३. सदर दुरुस्तीचा खर्च सन २०१०-११ मध्ये उपलब्ध असलेल्या मंजुर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.३ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०११०२१७१८०५४२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( कैलास द. भंडलकर )
उप सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.(सोबत मुळ अंदाजपत्रक )
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट.
जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भोकर.
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.१,किनवट.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.